कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या व वाढीव बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र. २०१ /बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख : १८ ऑगस्ट, २०१७

वाचा:

१) शासन निर्णय क्र. पंसई २०१०/ प्र.क्र. ३६/पंरा-७ दिनांक १९.०१.२०११
२)शासन निर्णय क्र. पंसई २०१४/ प्र.क्र. ५३/पंरा-७ दिनांक २२.०७.२०१४
३)शासन निर्णय क्र. पंसई २०१४/ प्र.क्र. ५१/पंरा-७ दिनांक २४.०७.२०१४
४)कार्यकारी अभियंता (बांध) यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/ का ४(५)/ प्रई/४७९२/१६, दि. २०.०६.२०१६
५)कार्यकारी अभियंता (बांध) यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/ का ४(५)/ प्रई/६८२१/१६, दि. २१.०९.२०१६
६)कार्यकारी अभियंता (बांध) यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/ अंकेक्षक/६९५४/२०१६, दि. २३.०९.२०१६
७)कार्यकारी अभियंता (बांध) यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/ उपकाअ/८८७३/१६, दि. ११.११.२०१६

प्रस्तावना :-

कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद, नागपूर यांनी वरील संदर्भीय पत्रान्वये कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या व वाढीव बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. कळमेश्वर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास शासन निर्णय दिनांक १९.०१.२०११ अन्वये रु. १७४.०९ लक्ष इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तदनंतर, शासन निर्णय दिनांक २२.०७.२०१४ अन्वये फर्निचर सुविधेसह उपकामासाठी रु. ५५.२८ लक्ष इतक्या रक्कमेची तसेच, शासन निर्णय दिनांक २४.०७.२०१४ अन्वये रु. २००.२८ लक्ष इतक्या रक्कमेची सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

३. कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीमध्ये काही विभागांना कक्ष न मिळाल्याने, तसेच रेकॉर्ड रुम व कृषी विभागाचे साहित्य ठेवण्यास अडचण होत असल्यामुळे प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याचे वाढीव बांधकाम करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने पंचायत समितीने दिनांक १७.०२.२०१६ रोजी ठराव क्र. ८(१) मंजूर केला आहे. कळमेश्वर पंचायत समिती “क” वर्ग दर्जाची असल्यामुळे जास्तीत जास्त १४०० चौ.मी. इतकेच बांधकाम पंचायत समितीकरीता अनुज्ञेय आहे. सध्या सदर इमारतीचे क्षेत्रफळ १०२६.५० चौ.मी. आहे. सद्य:स्थितीत, सार्वजनिक बांधकाम विभगाच्या मानकानुसार पंचायत समिती कळमेश्वर करीता पदाधिकारी तसेच मंजूर अधिकारी व कर्मचारी यांच्याकरीता एकूण १९०० चौ.मी. जागेची आवश्यकता आहे. या करीता कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद, नागपूर यांनी सदर इमारतीवर पहिल्या माळ्याचे ८२६.४२ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. सदर बांधकाम केल्यास पंचायत समिती इमारतीचे बांधकाम एकूण

१८५२.९२ चौ.मी. क्षेत्रफळाचे होणार असून अनुज्ञेय क्षेत्रफळापेक्षा ४५२.९२ चौ.मी. इतके जादा क्षेत्रफळ बांधकाम जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रस्तावित केले आहे. याकरीता, कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद,नागपूर यांनी सन २०१५-१६ ची दरसूचीवर आधारीत रु. ३६४.३१ लक्ष इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंम्मतीचा प्रस्ताव सादर केला आहे.

४. कार्यकारी अभियंता(बांध) जिल्हा परिषद नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या व वाढीव बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याच्या रुपये ३६४.३१ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णयः-

५. कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या व वाढीव बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याच्या रुपये ३६४.३१ लक्ष (रुपये तीन कोटी चौसष्ट लक्ष एकतीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या वाढीव बांधकामासाठी सादर केलेल्या पहिल्या मजल्याच्या आराखड्यास मुख्य वास्तुशास्त्रज्ञ /उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ प्रादेशिक विभाग यांची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजीत पहिल्या मजल्याचे बांधकाम मुळ प्रशासकीय इमारत बांधकामावर करावयाचे असल्यामुळे मुळ बांधकामास क्षती पोहोचणार नाही याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र घेणे बंधनकारक राहील.

३) कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या वाढीव बांधकामासाठी मुख्य वास्तुशास्त्रज्ञ /उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ प्रादेशिक विभाग यांनी मंजूर केलेल्या आराखड्यानुसार हाती घेताना स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

४) कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या तळमजल्यावर पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकाऱ्यांसाठी प्रसाधनगृहा-सह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात आलेली नसल्यास तशी व्यवस्था पहिल्या मजल्याच्या वाढीव बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात करण्यात यावी.

५) कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या वाढीव बांधकामाच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

६) प्रस्तुत वाढीव इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

७) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

१०) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

६. कळमेश्वर पंचायत समिती (जि. नागपूर) नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या व वाढीव बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENERAL ABSTRACT FOR KALMESHWAR P.S. BLDG., FIRST FLOOR & ADDITIONAL WORKS | | |
|---|---|---|
| **Sr. No** | **Description of item** | **Amount (in Rs.)** |
| **A** | **Cost of Building Proper** | |
| **1** | **Construction of R.C.C. Framed Flat roof slab structure-First Floor** | **23066374.00** |
| **2** | **Add 4% for Contingencies** | **922656.00** |
| **3** | **Add 1.50 % for R.C.C. Design** | **345996.00** |
| **4** | **Add 10 % for Water Supply & Drainage Arrangement** | **2306637.00** |
| **5** | **Add 2 % for Computerization** | **461327.00** |
| **6** | **Internal roads etc. L.S. Provision** | **500000.00** |
| **7** | **Add for Fire Fighting Arrangement L.S. Provision** | **20000.00** |
| **8** | **Add for Parks & Garden L.S.** | **50000.00** |
| **9** | **Add for pump & Bore well** | **200000.00** |
| **10** | **Add for Rain water Harvesting (L.S.)** | **50000.00** |
| **11** | **Add for Furniture, Partition, P.O.P. works etc.<br>Total Carpet Area F.F. 1026.60 sqm.@ Rs.4000/sqm** | **4106400.00** |
| | **Total (A)** | **32029389.00** |
| **B** | **Electrification Provision** | |
| **1** | **Add for Internal Electrification @ 12 % on Rs. 23066374.00** | **2767965.00** |
| **2** | **Outer Illumination** | **200000.00** |
| **3** | **Supply charges of M.S.D.C.L.(M.S.E.B.)** | **50000.00** |
| | **Total (B)** | **3017965.00** |
| **C** | **Price Variation charges 6 % on Rs. 23066374.00** | **1383982.00** |
| | **Total (C)** | **1383982.00** |
| | **Total (A+B+C)** | **36431336.00** |
| | **SAYS Rs** | **36431000.00** |

७. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८१८११०८२५२७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2017.08.18 11:55:49 +05'30'

( र. आ. नागरगोजे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो./ मु.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
११) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
१२) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर
१३) सभापती, पंचायत समिती, कळमेश्वर, जिल्हा नागपूर
१४) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, कळमेश्वर, जिल्हा नागपूर
१५) निवडनस्ती-बांधकाम-४ ग्रा.वि. व ज.सं.वि. बांधकाम भवन फोर्ट मुंबई-४०० ००१